स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद) यांनी उच्च माध्यमिक शाळा सुरु करण्यासंदर्भात....
जिल्हा परिषद, गडचिरोली अंतर्गत १) जिल्हा परिषद हायस्कूल, कोनसरी, २) जिल्हा परिषद हायस्कूल, चामोर्शी व ३) जिल्हा परिषद हायस्कूल, मोहली, ता.धानोरा, जि.गडचिरोली.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नमाशा-१४२१/प्र.क्र.८२०/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १८ जानेवारी, २०२२

**वाचा -**

१) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक:नमाशा-२००९/ (४९७/ ०९)/माशि-१, दिनांक ११ जून, २००९.
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिसं/माध्य/स्वयंअर्थ/२०२१-२२/एस-४/३०८२, दि.२२/०९/२०२१.

**प्रस्तावना -**

जिल्हा परिषद, गडचिरोली अंतर्गत १) जिल्हा परिषद हायस्कूल, कोनसरी, ता.चामोर्शी २) जिल्हा परिषद हायस्कूल, चामोर्शी, ता.चामोर्शी व ३) जिल्हा परिषद हायस्कूल, मोहली, ता.धानोरा या माध्यमिक शाळांना जोडून उच्च माध्यमिक (इ. ११ वी ते इ. १२ वी) चे वर्ग स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर सुरु करण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास सादर केला आहे. सदर ०३ उच्च माध्यमिक शाळांना परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत जिल्हा परिषद, गडचिरोली यांचे परिक्षेत्रातील खालील नमुद ०३ माध्यमिक शाळांना जोडून उच्च माध्यमिक शाळा सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून दर्जावाढ करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन स्तरावरून परवानगी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | माध्यमिक शाळेचे नाव | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| ०१. | जिल्हा परिषद हायस्कूल, कोनसरी, ता.चामोर्शी, जि.गडचिरोली | मराठी | राज्यमंडळ | माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक शाळा (इ. ११ वी ते इ. १२ वी, कला शाखा) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ०२. | जिल्हा परिषद हायस्कूल, चामोर्शी, जि.गडचिरोली | मराठी (विज्ञान शाखा- इंग्रजी ) | राज्यमंडळ | माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक शाळा (इ. ११ वी ते इ. १२ वी, कला व विज्ञान शाखा) |
| ०३. | जिल्हा परिषद हायस्कूल, मोहली, ता.धानोरा, जि.गडचिरोली | मराठी (विज्ञान शाखा- इंग्रजी ) | राज्यमंडळ | माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक शाळा (इ. ११ वी ते इ. १२ वी, कला व विज्ञान शाखा) |

**अटी व शर्ती:-**

I. सदर ०३ उच्च माध्यमिक शाळांना दर्जावाढीने स्वयंअर्थसहाय्यित तत्त्वावर वर्ग सुरु करण्यास मान्यता दिलेली असल्याने उक्त शाळांसंदर्भात येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

II. माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमान्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवळी निर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटींचे आणि शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०११८११४१४५३४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Suresh Padole

Digitally signed by Pradip Suresh Padole
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=481cbce0eb79e3ee398d9eda25f5efbce98773459b0760f9d553dbce4472de1c,
pseudonym=C4F56532DA949C43283C7D513A867898C8BB80F3,
serialNumber=DA7528175505A3220AA60D43BC262BA09B055BA986E0E817D7150AA2D85AFEEE,
cn=Pradip Suresh Padole
Date: 2022.01.18 11:43:10 +05'30'

**(प्रदिप पडोळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. गडचिरोली, गडचिरोली.
४. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. शिक्षण संचालक, (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर.
७. शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद (माध्यमिक), जि.प. गडचिरोली.
८. निवडनस्ती (एसएम २)